पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत
उद्योजकांचे सामाजिक उत्तरदायित्व
Corporate Social Responsibility
(CSR) उपक्रमाबाबत धोरण निश्चिती.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः सीएसआर-२०१४/प्र.क्र.२८/पापु-०८**
**गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,**
**७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ००१.**
**तारीख: १९ नोव्हेंबर,२०१४**

**वाचा :-**

**केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या www.mdws.gov.in या संकेतस्थळावर पाणी पुरवठा, पाणी गुणवत्ता व स्वच्छता संदर्भात Corporate Social Responsibilities (CSR) बाबतच्या मार्गदर्शिका.**

**प्रस्तावना:-**

१. उद्योजकांचे सामाजिक उत्तरदायित्व (CSR) संबंधित मार्गदर्शक तत्त्वांची निर्मिती करून राज्य व केंद्र शासनाच्या धोरणात या मार्गदर्शक तत्वांचा समावेश करण्याचे केंद्र शासनाने निश्चित केले आहे.

२. उद्योजकांचे सामाजिक उत्तरदायित्व (CSR) यामध्ये एखादया व्यवसायाने सामाजिक बांधीलकी म्हणून मोठया व स्थानिक समुदायाच्या आर्थिक व सामाजिक विकासासाठी केलेला सहयोग, केलेले प्रयत्न इ. बाबींचा समावेश होतो. व्यवसायाशी निगडीत अथवा समुदायाची गरज लक्षात घेऊन तसेच प्रकल्प क्षेत्रातील विविध सामाजिक, आर्थिक, पर्यावरणाशी संबंधित समस्या दूर करण्यासाठी स्वेच्छा सेवा पुरविण्याचे कार्य (CSR) च्या माध्यमातून केले जाते. शासनामार्फत पाणी आणि स्वच्छतेशी संबंधित चालू असलेले काम पाहून बहुतांशी कंपन्या पाणी आणि स्वच्छतेसंबंधी कार्यपध्दत अवलंबण्यासाठी प्रेरित झाल्या आहेत.

३. महाराष्ट्र राज्यात बहुतांशी (CSR) कंपन्या विविध कार्यपध्दतीचा अवलंब करीत आहेत.आज महाराष्ट्र शासन विविध योजना, कार्यक्रम व अभियानाच्या माध्यमातून ग्रामपंचायत व महानगरपालिका क्षेत्रात पाणी व स्वच्छता सुविधा निर्माण करण्याचे कार्य करत आहे. महाराष्ट्र शासनाच्या माध्यमातून सुरू असलेले हे काम CSR मार्फत सुरू असलेल्या कामाशी पूरक असून CSR या शासनामार्फत सुरू असलेल्या कामात सहयोग देण्यासही इच्छुक आहेत. CSR चे या कामात सहयोग हवे असेल तर त्यासाठी CSR कडून प्राप्त करून घ्यावयाच्या सहकार्याची रचना (Framework) निश्चित करावी लागेल, जेणेकरून शासनाकडून करावी लागणाऱ्या CSR ना सहकार्याची नेमकी दिशा निश्चित होईल. नवीन कंपनी कायदा,२०१३ मधील CSR साठीच्या तरतुदींनुसार अशा सर्व कंपन्या ज्यांचा निव्वळ नफा रु.५ कोटी असेल किंवा वार्षिक उलाढाल रु.१००० कोटी असेल किंवा निव्वळ मालमत्ता

रु.५०० कोटी असेल, त्यांनी त्यांच्या ३ वर्षाच्या सरासरी निव्वळ नफ्याच्या २ टक्के नफा CSR कार्यासाठी खर्च करणे बंधनकारक आहे. सदर बाब लक्षात घेता CSR च्या या निधीचा पाणी व स्वच्छता कामात वापर करण्यासाठी महाराष्ट्र शासनास एक संधी आहे असे म्हणता येईल. सदर बाब लक्षात घेता CSR धोरणाची निश्चिती करणे महत्वाचे ठरते

## शासन निर्णय:-

**<u>१. उद्देश:-</u>**

पाणी पुरवठा व स्वच्छता या कार्यक्षेत्रात CSR उपक्रमाचे सुलभीकरण, समन्वयन आणि सनियंत्रण करणे हा धोरणाचा मुख्य उद्देश आहे.

**२. <u>एक खिडकी दृष्टीकोन</u>:**

प्रस्तावित CSR उपक्रमांच्या सुलभीकरणासाठी व अनुषंगिक कार्यप्रणालीसाठी एक खिडकी दृष्टीकोन निश्चित करण्याचा निर्णय विभागाने घेतला आहे. या CSR कार्यपध्दतीच्या मंजूरीसाठी सुलभीकरणासाठी शासनाकडून तीन स्तरीय व्यवस्था कार्य करेल. या तीन स्तरीय रचनेत राज्य स्तरावर CSR सुकाणू समिती, विभागीय स्तरावर CSR समिती आणि जिल्हा स्तरावर CSR समिती इ. चा समावेश असेल. या समित्या त्या त्या स्तरावर CSR उपक्रमाच्या कार्यासाठी एक खिडकी म्हणून कार्य करतील.

**३. <u>राज्यस्तरीय सुकाणू समितीची भूमिका व जबाबदाऱ्या</u> :**

३.१ पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत ग्रामपंचायत, तालुका, जिल्हा, विभाग आणि राज्यस्तरावर संस्थात्मक रचना विस्तारित रूपाने आज कार्यरत आहे. या संस्थेत काम करीत असलेल्या विविध विभागांच्या भूमिका व जबाबदाऱ्या स्पष्ट मांडण्यात आल्या आहेत.

३.२ विभाग “राज्यस्तरीय सुकाणू समिती” स्थापन करेल. तिची भूमिका व जबाबदारी खालीलप्रमाणे राहील.

अ. राज्य सुकाणू समिती CSR उपक्रमाचे नियोजन, अनुषंगिक निर्णय घेणे, समस्येसंबंधी ठराव संमत करणे इ. बाबींचे सुलभीकरण करेल.

आ. सुकाणू समिती ही संबंधित संचालनालय, तालुका व जिल्हास्तरीय अधिकारी, विस्तार अधिकारी, क्लस्टर प्रमुख व इतर प्रवर्तकांचे CSR उपक्रमाच्या अंमलबजावणीसाठी सबलीकरण करेल.

इ. सुकाणू समिती उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांच्या भूमिका व जबाबदाऱ्या निश्चित करेल व CSR उपक्रमाचे सनियंत्रण करेल.

**४. <u>रचना:</u>**

४.१ राज्यस्तरीय सुकाणू समिती ही प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात येईल व त्यामध्ये शासना सेवेतील व शासन सेवेच्या बाहेरील सदस्यांचा समावेश असेल. तसेच विषय तज्ञ व लाभार्थी यांचादेखील समावेश असेल.

४.२ राज्यस्तरीय CSR सुकाणू समितीची रचना खालील प्रमाणे असेल:-

| अ.क्र. | पद | समितीतील पद |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ४. | प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग | सदस्य |
| ६. | सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (MJP) | सदस्य |
| ७. | मुख्य अभियंता, मध्यवर्ती नियोजन, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (MJP) | सदस्य |
| ८. | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) | सदस्य |
| ९. | उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RSPMU) | सदस्य |
| १०. | प्रकल्प व्यवस्थापक, जलस्वराज्य-II | सदस्य |
| ११ | प्रतीनिधी - महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, उद्योग व शेती | सदस्य |
| १२ | प्रतीनिधी - बॉम्बे चेंबर ऑफ कॉमर्स व उद्योग | सदस्य |
| १३ | वॉश अधिकारी, युनिसेफ (UNICEF) | सदस्य |
| १४ | प्रतीनिधी - टाटा सामाजिक विज्ञान संस्था (TISS) | सदस्य |
| १५ | संचालक, महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी प्रशिक्षण व संशोधन संस्था (MEETRA) - नाशिक रोड | सदस्य |
| १६ | प्रतीनिधी - from सामाजिक संस्था , बिगर शासकीय संस्था व विषय तज्ञ | सदस्य |
| १७ | संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, वासो (WSSO) | सदस्य सचिव |

**४.३ प्रमुख कार्य:**

सुकाणु समितीच्या कार्यात पुढील बाबींचा समावेश राहील:

a. पाणी व स्वच्छते संदर्भातील CSR उपक्रमांच्या व्यवस्थापनाचा व सुलभीकरणाचा आराखडा तयार करणे.

b. मासिक/त्रैमासिक बैठकांचे आयोजन.
c. CSR उपक्रमांतर्गत मांडण्यात आलेल्या गरजा/अडचणी, प्रस्तावित कामे, वेळापत्रक आणि अपेक्षित परिणाम या बाबींचे पुर्नमुल्यांकन करुन मुल्यमापन करणे.
d. पाणी व स्वच्छता व्यवस्थेतील संबंधित संचालनालय, जिल्हा/तालुका अधिकारी, विस्तार अधिकारी, गट प्रमुख यासह इतर सहाय्यकारी घटकांचे सहकार्य निश्चित करणे.
e. सीएसआर उपक्रमांच्या अंमलबजावणी व पुर्णत्वासाठी सनियंत्रण व सहाय्य.
f. राबविलेल्या सीएसआर उपक्रमांची शाश्वतता निश्चित करणाऱ्या कृती विकसित करुन त्यांची अंमलबजावणी करणे.
g. सीएसआर उपक्रमांच्या अंमलबजावणीपूर्व, अंमलबजावणी दरम्यान व अंमलबजावणी नंतरच्या स्थितीसंबंधी सर्वेक्षणाच्या अहवालाचे संकलन व नित्य उपलब्धता.
h. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या वतीने हाती घेतलेल्या या उपक्रमाच्या विकासासाठी/ विस्तारासाठी विनंती सुचविणे व सुरु करणे.
i. पाणी व स्वच्छतेसंबंधी उपक्रमांत सहभाग घेण्यासंबंधी रुची दर्शविणाऱ्या विविध कंपन्यांना सीएसआरअंतर्गत सहाय्यसाठीचे विनंती प्रस्ताव पाठविणे.
j. पाणी व स्वच्छता विभागाच्या विशेष उपक्रमाच्या आर्थिक तरतुदीमधील तूट भरुन काढण्यासाठी सीएसआर कडून सहकार्याची व्यवस्था करणे.
k. सीएसआरच्या माध्यमातून पूर्णत: किंवा अंशत: राबविल्या जाणाऱ्या उपक्रमांच्या प्रगतीसंबंधीचे नियमित प्रगती अहवाल उपलब्ध करुन देणे.
l. ग्रामपंचायत नगर परिषद स्तरावरील पायाभूत सुविधांच्या गरजांसंबंधीची माहिती प्रकाशित करणे.
m. स्थानिक समूदायाच्या व सीएसआर अभिरुची यांची यथायोग्य सांगड घालणे
n. पाणी स्वच्छता विभागाच्या जिल्हा, तालुका, गट स्तरावरील अधिकाऱ्यांकडून निश्चित केल्या गेलेल्या गरजांनुसार करावयाच्या उपायांचे नियोजन व अंमलबजावणी सुलभ करणे.
o. उपक्रम अंमलबजावणीसाठी आवश्यक ती कौशल्ये आकलन क्षमता असणाऱ्या स्वयंसेवी संस्था, शिक्षण तज्ञ, प्रशिक्षक इत्यादींच्या निवडीसाठी सहकार्य करणे.
p. राज्यातील व राज्याबाहेरील यशस्वी सीएसआर उपक्रमांसंबंधीची माहिती उपलब्ध करणे, प्रसारित करणे.

## ५. विभाग स्तरीय CSR समिती:-

५.१ विभागातील सर्व जिल्ह्यातील CSR च्या कार्याचे सुलभीकरण करण्यासाठी व कामांवर सनियंत्रण ठेवण्यासाठी विभाग स्तरीय CSR समिती स्थापन करण्यात येईल.

५.२ विभाग स्तरीय CSR समितीची रचना खालील प्रमाणे राहील :

| अ.क्र. | पद | समितीतील पद |
|---|---|---|
| १. | विभागीय आयुक्त | अध्यक्ष |
| २. | उपायुक्त (विकास) | सदस्य |
| ३. | उपायुक्त (महिला व बाल विकास) | सदस्य |
| ४. | उपसंचालक (शालेय शिक्षण व क्रिडा) | सदस्य |
| ५. | प्रतीनिधी - महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) | सदस्य |
| ६. | प्रतीनिधी - महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, उद्योग व शेती | सदस्य |
| ७. | प्रतीनिधी - बॉम्बे चेंबर ऑफ कॉमर्स व उद्योग | सदस्य |
| ८. | विभागीय मूल्यमापन व संनियंत्रण सल्लागार , वासो (WSSO) | सदस्य |
| ९. | सहाय्यक मूल्यमापन व संनियंत्रण सल्लागार, जलस्वराज्य -II | सदस्य |
| १०. | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ११. | अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (MJP) | सदस्य सचिव |

### ५.३ प्रमुख कार्ये

सुकाणू समितीच्या कार्यात पुढील बाबींचा समावेश राहील:

अ. CSR क्षेत्रातील पुढाकाराबाबत विभाग पातळीवर गरजांची माहिती घेऊन त्याची पूर्तता करणे अथवा आवश्यकतेनुसार राज्यस्तरीय सुकाणू समितीकडे पाठविणे.

आ. जिल्हा स्तरीय समितीने तयार केलेले सर्व काल मर्यादित आराखडे मंजूर करून त्यांच्या कार्यावर संनियंत्रण ठेवणे.

इ. विविध उद्योग समूहांच्या विभागातील व जिल्हानिहाय CSR क्षेत्रातील पसंतीच्या कामाची माहिती एकत्र करून संकलित करणे राज्यस्तरीय समितीस सूचित करणे.

ई. CSR कार्याचे संनियंत्रण करणे व राज्य सुकाणू समितीस वेळोवेळी आवश्यक माहितीचे आदान-प्रदान करणे.

उ. उद्योग समूहांच्या पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील CSR कार्यकलापांना आपल्या स्तरावर थेट अथवा जिल्हा समितीच्या माध्यमातून सर्व आवश्यक मंजुऱ्या प्रदान करणे.

<u>६. जिल्हा स्तरीय CSR समिती:</u>

६.१ जिल्हास्तरीय CSR समिती जिल्हा स्तरावरील CSR बाबत सर्व कार्यांवर देखरेख ठेवेल व त्यासाठी आवश्यक समन्वय घडवून आणेल. सदर समिती जिल्ह्यातील ज्या उद्योजकांना CSR उपक्रमामध्ये समाविष्ट व्हावयाचे असेल, त्या सर्व उद्योजकांसाठी पहिल्या स्तराची संपर्क समिती म्हणून कार्य करेल. यासाठी समिती सदस्यांचा संपर्क तपशील विभागाच्या संकेत स्थळावर जिल्हानिहाय उपलब्ध करून देण्यात येईल.

६.२ विभाग स्तरीय CSR समितीची रचना खालील प्रमाणे राहील:

| अ.क्र. | पद | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत), जिल्हा परिषद | सदस्य |
| ३ | जिल्हा प्रकल्प व्यवस्थापक (स्वच्छता) | सदस्य |
| ४ | वरिष्ठ भू-वैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ५ | प्रतीनिधी - महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, उद्योग व शेती | सदस्य |
| ६ | प्रतीनिधी-बॉम्बे चेंबर ऑफ कॉमर्स व उद्योग | सदस्य |
| ७ | प्रतिनिधी - शालेय शिक्षण आणि क्रीडा विभाग | सदस्य |
| ८ | प्रतिनिधी - महिला व बाल विकास विभाग ( from ICDS ) | सदस्य |
| ९ | कार्यकारी अभियंता , ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

६.३ **प्रमुख कार्ये : -**

जिल्हास्तरीय समितीचे प्रमुख कार्य खालीलप्रमाणे असतील:

अ) जिल्हयाच्या CSR पोर्टलवर ग्रामपंचायत आणि महानगरपालिकाच्या गरजा प्रकाशित करण्याची जबाबदारी असेल आणि याची प्रक्रिया विभागीय पातळीवरील सुकाणू समितीच्या मंजूरीनुसार असेल.

ब) मंजूर उपक्रमांचा निर्धारित वेगळा अंमलबजावणी आराखडा तयार करण्याची जबाबदारी ही जिल्हा समितीची असेल.

क) CSR उपक्रम करण्यास उत्सुक अशा सर्व उद्योजकांबद्दलची माहिती संकलीत करण्याची जबाबादारी ही जिल्हा समितीची असेल आणि त्याचा अहवाल विभागीय सुकाणू समितीस पाठविणे.

ड) CSR उपक्रमाच्या अंमलबजावणीवर लक्ष ठेवणे आणि विभागीय सुकाणू समितीस नियमीत अहवाल पाठविणे.

## ७. पाणी पुरवठा, पाणी गुणवत्ता व स्वच्छता क्षेत्रातील धोरणात्मक सहभागाची संभाव्य क्षेत्रे:

### अ. पाणी पुरवठा

१. ग्रामपंचायत, नगरपरिषदा व समुदाय स्तरावर पाऊसपाणी संकलन व्यवस्थेचा तांत्रिक आराखडा व उभारणी.

२. पाणी पुरवठा स्त्रोतांसाठी तांत्रिक आराखडे आणि अर्थसहाय्य उपलब्ध करुन देणे. यामध्ये भूसाठा वाढीसाठी पारंपारिक व अपारंपारिक तंत्रांचा समावेश आहे.

३. प्रत्येक कुटुंबापर्यंत पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्यासाठी कमी खर्चाच्या व्यवस्थेच्या तंत्रज्ञानासंबंधीचे आराखडे उपलब्ध करुन देणे.

४. ग्रामपंचायत स्तरावर पाणी शुद्धीकरण प्रक्रिया सयंत्र, सांडपाणी प्रक्रिया संयंत्र, प्रक्रिया संयंत्राचे आराखडे उपलब्ध करुन देणे व संयंत्रांची उभारणी करणे.

५. ग्रामपंचायत स्तरावर पाणी वापर मोजणारे मिटर उपलब्ध करुन देणे.

६. ग्रामपंचायत स्तरावर निक्षारीकरण संयंत्र संबंधी आराखडे उपलब्ध करुन देणे व उभारणी करणे.

७. पाणी पुरवठा योजनांसाठी अपारंपारिक उर्जा स्त्रोतांची उपलब्धता करुन देणाऱ्या व्यवस्था उभारणे.

८. पाणी पुरवठा संबंधी तांत्रिक कौशल्य प्रदान करणाऱ्या क्षमता बांधणी प्रशिक्षणांचे आयोजन करणे.

### ब. पाणी गुणवत्ता

१. ग्रामीण भागात ग्रामपंचायत स्तरावर पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळांची उभारणी.

२. पाणी गुणवत्तेसंबंधी तांत्रिक कौशल्य विकसित करणाऱ्या क्षमताबांधणी उपक्रमांचे आयोजन.

३. सुरक्षित पेयजलासाठी घरगुतीस्तरावरील तांत्रिक उपाय/प्रक्रिया व्यवस्था पुरविणे (क्लोरीनीकरण आणि पाणी शुध्दीकरण).

४. रासायनिक दुषित पाण्यासंबंधी तसेच आरोग्यासंबंधी संशोधन पथदर्शी प्रकल्प हाती घेणे.

### क. स्वच्छता

**१. पुरवठा साखळी व्यवस्थापन**

अ. स्वच्छता साधनांची विक्री केंद्रे विकसित करणे.

आ. स्वच्छता साधनांच्या विक्री केंद्राच्या माध्यमातून स्वच्छता विषयक साहित्याची उपलब्धता सुनिश्चित करणे.

२. **ग्रामीण क्षेत्रासाठी सुयोग्य अशा नाविण्यपूर्ण, कमी किंमतीच्या वापरण्यासाठी सुलभ शौचालयांचे आराखडे व प्रत्यक्ष बांधकाम अशा सुविधा पुरविणे.**

१) यामध्ये पुढील व्यवस्थांचा समावेश असेल.

अ. कुटुंबस्तरावरील वैयक्तिक शौचालय

आ. लहान मुलांसाठी अनुकुल शालेय शौचालय

इ. अंगणवाडी मुलांसाठी अनुकुल शौचालय

ई. सार्वजनिक शौचालय, बायो टॉयलेट, ई - टॉयलेट, ऑटो क्लीन टॉयलेट, इत्यादी

उ. महिला स्वच्छतागृहे

३. ग्रामपंचायतींसाठी नाविण्यपूर्ण व कमी किमतीच्या घनकचरा व्यवस्थापनाच्या पायाभूत सुविधांचा पुरवठा व उभारणी

४. ग्रामपंचायतींसाठी नविण्यपूर्ण व कमी किंमतीच्या सांडपाणी व्यवस्थापनाच्या पायाभूत सुविधांचा पुरवठा व उभारणी

५. जैव-कचरा व्यवस्थापन.

६. मासिक पाळी संबंधी स्वच्छता व्यवस्थापन

अ. स्वयंसहाय्यता समूहांच्या माध्यमातून ग्रामीण भागात सॅनिटरी नॅपकीन उत्पादन केंद्रे विकसित करणे.

आ. ग्रामपंचायत क्षेत्र, शाळा व शासकिय कार्यालयात वापरलेल्या सॅनिटरी नॅपकीनच्या सुयोग्य विल्हेवाटीसाठी स्वच्छतानुकुल व्यवस्था निर्माण करणे.

७. स्वच्छतेसंबंधी तांत्रिक कौशल्य विकसित करण्यासाठी क्षमता बांधणी

८. पर्यावरणास अनुकुल असे शोषखड्डे, निचरा टाक्या, परसबागांची निर्मिती, तसेच नवीन येणाऱ्या तंत्रज्ञानाच्या मदतीने घरगुती कचरा व सांडपाण्याचे व्यवस्थापन करणे.

८. **<u>सीएसआर उपक्रमांच्या संदर्भात लक्षात घ्यावयाच्या काही महत्वाच्या बाबी:</u>**

१. सीएसआर उपक्रमात सहभागी कंपन्यांना कुठलीही जागा किंवा संपत्ती त्यांच्या नावे करुन दिली जाणार नाही.

२. उपक्रमात सहभागी होणाऱ्या कंपन्यांच्या कुठल्याही देयतेला विभाग जबाबदार राहणार नाही.

३. उपक्रमांच्या गरजेनुसार प्रकल्प व्यवस्थापन गट माहिती तंत्रज्ञानाच्या आधारे अंमलबजावणीत सहकार्य व अंमलबजावणीचे सनियंत्रण करेल.

## ९. CSR मार्गदर्शक सूचनांचे द्रुतचित्र:

९.१ CSR च्या मार्गदर्शक सूचनांनुसार, महारत्नसहित सर्व नफा कमावणाऱ्या केंद्रीय सार्वजनिक क्षेत्रातील कंपन्यांना (CPSEs), CSR मधील उपक्रम निवडून तो प्रकल्प तत्त्वावर राबविणे बंधनकारक आहे. तसेच गतवर्षातील निव्वळ नफ्याच्या टक्केवारीनुसार खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे मंडळाच्या निर्णयाद्वारे आर्थिक तरतूद करणे बंधनकारक आहे. (Corporate Social Responsibility and Sustainability for Central Public Sector Enterprises मधील परिच्छेद १.५.१ ची मार्गदर्शक तत्वे, दिनांक ०१/०४/२०१३):

९.२ कंपन्यांनी त्यांना गतवर्षी करपश्चात झालेल्या नफ्याच्या आधारावर (Profit After Tax) आर्थिक तरतूद करावयाची आहे. सदर तरतूद खालील तक्त्यात दर्शविली आहे.

| कंपनीला गतवर्षी करपश्चात झालेला नफा (Profit After Tax) | CSR उपक्रमासाठी आर्थिक तरतूद (गतवर्षी करपश्चात झालेला नफ्याच्या प्रमाणात) |
|---|---|
| रु. १०० कोटी पेक्षा कमी | ३% – ५% |
| रु. १०० कोटी ते रु. ५०० कोटी | २% – ३% |
| रु. ५०० कोटी व त्यापेक्षा अधिक | १% – २% |

९.३ तोट्यात असणाऱ्या CPSEs कडून CSR साठी तरतूद करणे अपेक्षित नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११७१२३५१२१८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2014.11.20 16:38:11 +05'30'

**(अजय सावरीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खासगी सचिव.

३. मा. राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खासगी सचिव.

४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे खासगी सचिव.

५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. प्रधान सचिव, महिला व बाल कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०.अध्यक्ष, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC).

११. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

१२. प्रतीनिधी, महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, उद्योग व कृषि.

१३. प्रतीनिधी, मुंबई चेंबर ऑफ कॉमर्स व उद्योग.

१४. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

१५. विभागीय आयुक्त (सर्व).

१६. उपसचिव (सर्व),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).

१८. प्रकल्प व्यवस्थापक, जलस्वराज्य- II, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RSPMU),बेलापुर, नवी मुंबई.

१९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, वासो (WSSO).

२०. उपायुक्त (विकास) (सर्व).

२१. उपायुक्त (महिला व बाल कल्याण विभाग) (सर्व).

२२. विभागीय उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व).

२३. अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).

२४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (सर्व).

२५. वरिष्ठ भू-वैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व).

२६. उप प्रकल्प व्यवस्थापक (स्वच्छता), जिल्हा परिषद (सर्व).

२७. प्रतीनिधी - सामाजिक संस्था, बिगर शासकीय संस्था व विषय तज्ञ.

२८. सर्व कार्यासने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

२९. निवड नस्ती (पापु-०८).

**Policy for the implementation of Corporate Social Responsibility (CSR) Activities associated with Water Supply & Sanitation Department.**

## Government of Maharashtra
### Water Supply and Sanitation Department
### Government Resolution No.: CSR 2014/C.R.-28/WS-08
**G.T.Hospital Complex, 7th floor,**
**Lokmanya Tilak Road, Mumbai-400 001**
Date: **19 November, 2014**

**Read -**

Guidelines published on Corporate Social Responsibilities (CSR) by www.mdws.gov.in on Water Supply, Water Quality and Sanitation Sector.

**Introduction -**

Ministry of Drinking Water and Sanitation, Government of India vide above referred guidelines reiterated the need of a national and state level policy on Corporate Social Responsibility (CSR).

2. Corporate Social Responsibility (CSR) comprises the efforts and commitment made by businesses to contribute economic and social development of the local community and society at large. Through CSR initiatives, companies provide voluntary support to address various social, environmental and economical issues related to their business operations and/or the needs of the local communities, many companies are motivated to support Water Supply & Sanitation activities as part of CSR.

3. In Maharashtra, different companies are supporting a variety of CSR activities with a focus towards improving access and quality of water supply and sanitation services to rural masses. Government of Maharashtra has focused on improving the Water Supply & Sanitation system and the learning outcomes in GPs and MCs by implementing reforms through programs at all levels. The efforts of the corporate sector are complementary to the overall functioning of the department and the corporates are willing to continue supporting the department. However there is a need to create a framework to support the corporate efforts and channelize them so that they get adequate support from the government side and their contribution add to the objectives of the government. The provision regarding CSR in the New companies Act, 2013 have brought all the companies within its ambit with at least Rs. 5 crores net profit of Rs. 1000 crores turnover or Rs. 500 crores net worth, making its mandatory for them to spend 2% of their three years average

net profit on CSR activities. This presents a big opportunity for the department to seek CSR funding, thus further accentuating the need to have a full-fledged CSR policy.

## **<u>Resolution</u>:-**

### **<u>1. Objective</u>**

The objective of this policy is to facilitate, co-ordinate and monitor Corporate Social Responsibility (CSR) support and activities in the field of Water Supply and Sanitation.

### **2. <u>Single Window Approach</u>**

In order to facilitate and streamline the proposed CSR activities, the department has decided to have single window approach. The single window approach will be supported by a three tier structure to ensure smooth approval and facilitation process for all CSR activities. The three tier structure would comprise of a State Level CSR Steering Committee, Revenue Division Level CSR Committee and a District Level CSR Committee. These committees will function as a single window to initiate any CSR activity at appropriate levels.

### 3. **<u>State level CSR Steering Committee: Role and Responsibilities</u>**

3.1 Water Supply & Sanitation Department has a well-defined institutional set up right from State, Divisional, District, Block, GP and habitation levels. The roles and responsibilities are also well defined for the stakeholders.

3.2 Department will create a 'State CSR Steering Committee' with the specified roles and responsibilities as described below.

a) This steering committee will facilitate planning, decision making and resolution of issues to improve the execution of CSR support and activities.

b) The state CSR Steering Committee shall empower the relevant Directorates, District/Block Officers, Extension Officers, Cluster Heads and other relevant enablers to manage the implementation of CSR initiatives.

c) The CSR steering committee shall also define roles and responsibilities for all the above mentioned officials and will control all CSR activities.

### **4. Composition**

**4.1** The State CSR Steering Committee will be chaired by The Secretary, Water Supply & Sanitation Department and will consist the members from inside and outside of the govt. It also include subject experts and stakeholders.

4.2 Following is the composition of State CSR Steering Committee:-

| **Sr.no** | **Designation** | **Status in the Committee** |
|---|---|---|
| 1 | Principal Secretary, Water Supply & Sanitation Department | Chairman |
| 2 | Principal Secretary, Rural Development Department | Member |
| 3 | Principal Secretary, Public Health Department | Member |
| 4 | Principal Secretary, School Education and Sports Department | Member |
| 5 | Principal Secretary, Women and Child Development Department | Member |
| 6 | Member Secretary, Maharashtra Jeevan Pradhikaran (MJP) | Member |

| | | |
|---|---|---|
| 7 | Chief Engineer, Central Planning, Maharashtra Jeevan Pradhikaran (MJP) | Member |
| 8 | Chief Executive Officer, Maharashtra Industrial Development Corporation (MIDC) | Member |
| 9 | Deputy Secretary & Project Director, Reform Support & Project Management Unit (RSPMU) | Member |
| 10 | Project Manager, Jalswarajya-II | Member |
| 11 | Member from Maharashtra Chamber of Commerce, Industry & Agriculture | Member |
| 12 | Member from Bombay Chamber of Commerce & Industry | Member |
| 13 | WASH Officer, UNICEF | Member |
| 14 | Representative from Tata Institute of Social Sciences (TISS) | Member |
| 15 | Director, Maharashtra Environmental Engineering Training & Research Academy (MEETRA) - Nashik | Member |
| 16 | Member from Civil Society, NGO's and Subject Experts | Member |
| 17 | Director, Water & Sanitation Support Organization (WSSO) | Member Secretary |

**4.3. Key Functions :-**

The functions of the steering committee shall include:

**a.** To create a framework for management and facilitation of Water Supply & Sanitation related CSR activities.

**b.** Arrange monthly/quarterly meetings.

**c.** To evaluate CSR activities by reviewing the need/issues addressed, the proposed plan, timelines, and projected outcomes.

**d.** To assure co-operation under the CSR activities from the relevant directorates, District/Block Officer, Extension Officer, Cluster Head and other relevant enablers in the Water Supply & Sanitation System.

**e.** To monitor and support the execution and completion of CSR activities.

**f.** To develop and implement actions to enable sustainability of implemented CSR activities.

**g.** To gather and maintain appropriate reports highlighting the baseline midline and end-line metrics for due implementation of the CSR activities.

**h.** To propose and initiate request for CSR support to augment initiatives undertaken by the Water Supply & Sanitation Department.

**i.** To release "request for support" proposal to various companies who have expressed interest in supporting water and sanitation related initiatives.

**j.** To channel CSR support to mitigate funding gaps for specified Water Supply & Sanitation Department initiatives.

**k.** To provide report on periodic basis on the progress of specified initiatives implemented by the Water Supply & Sanitation Department funded (partially or in full) by CSR support.

**l.** To publish information regarding requirements for infrastructure or other support at various GPs, MCs (by district, block, cluster).

**m.** To Facilitate matching of CSR interest and need at the community/local level.

**n.** To enable planning and execution of interventions based on needs identified by relevant district, block and cluster level officers of the Water Supply & Sanitation Department

**o.** To support in identifying relevant implementation/execution partners with relevant skills and capabilities required (such as NGO's contractors, education experts, trainers, etc.)

**p.** To share best practices of successful CSR initiatives from within and outside of the State.

**5. Division Level CSR Committee:-**

5.1 The CSR Committee at the level of Division shall be formed in order to facilitate and monitor all the CSR activities carried out in all districts of that division.

5.2 Following is the Composition of Division Level CSR Committee.

| **Sr. no** | **Designation** | **Status in the Committee** |
|---|---|---|
| 1 | Divisional Commissioner | Chairman |
| 2 | Deputy Commissioner (Development) | Member |
| 3 | Deputy Commissioner (Women and Child Development) | Member |
| 4 | Deputy Director (School Education and Sports) | Member |
| 5 | Representative, Maharashtra Industrial Development Corporation (MIDC) | Member |
| 6 | Representative, Maharashtra Chamber of Commerce, Industry & Agriculture | Member |
| 7 | Member from Bombay Chamber of Commerce & Industry | Member |
| 8 | Deputy Director, Groundwater Surveys & Development Agency | |
| 9 | Divisional Monitoring & Evaluation Consultant (WSSO) | Member |
| 10 | Assistant Monitoring & Evaluation, JS-II | Member |
| 11 | Superintending Engineer – Bharat Nirman Cell, Maharashtra Jeevan Pradhikaran (MJP) | Member Secretary |

5.3 **Key Functions**:-

The Committee shall perform following functions:

a) Collation of requirements at district level and either fulfil the requirements through CSR initiatives at its own level or pass on the state committee if required.
b) To monitor and approve all the time bound plans created by district committee
c) Collation of information about various corporate who are keen to do CSR activities in all the divisions and districts and report the same to the state level committee
d) Monitoring implementation of CSR activities and provide information to State Steering Committee on regular basis.
e) Provide all-necessary approvals to the corporate directly or through the District Committees for ferrying out CSR activities in Water Supply & Sanitation.

**6. <u>District Level CSR Committee</u>:-**

**6.1** The District CSR Committee shall be responsible for overseeing the coordination and implementation of CSR activities at the district level. It will also act as first level contact for all corporate bodies who wish to carry out CSR activities in that district. Their contact details would be uploaded on the CSR portal Webpage of department against their respective districts.

6.2 Following is the Composition of District Level CSR Committee

| **Sr.no** | **Designation** | **Status in the Committee** |
|---|---|---|
| 1 | Chief Executive officer, Zilla Parishad | Chairman |
| 2 | Deputy CEO (Village Panchayat), Zilla Parishad | Member |
| 3 | District Project Manager (Sanitation) | Member |
| 4 | Senior Geologist, Groundwater Surveys & Development Agency | Member |
| 5 | Members from Maharashtra Chamber of Commerce, Industry & Agriculture | Member |
| 6 | Members from Bombay Chamber of Commerce & Industry | Member |
| 7 | Representative from School Education and Sports Department | Member |
| 8 | Representative from Women and Child Development Department (from ICDS) | Member |
| 9 | Executive Engineer, Rural Water Supply, Zilla Parishad | Member Secretary |

6.3 **Key Functions**

The functions of the District level committee shall include.

a) Responsible for publishing information regarding the requirements at various GPS & MCs in its districts in the CSR portal and process the same for approval to the division level steering committee.
b) It shall be responsibility of the district committee to form a time bound plan for the implementation of the sanctioned activities.
c) Shall be responsible to collate the information about various corporate who are keen to do CSR activities and report the same to the division level committee
d) Monitor implementation of CSR activities and provide information to Division Steering Committee on regular basis.

**7. <u>Possible Areas for Strategic Alliances for Water Supply, Water Quality and Sanitation Sector:-</u>**

**A) Water Supply:-**

1. Providing technical design & installing Rain Water Harvesting units at Community Level in GPs and MCs.
2. Providing technical design and financial assistance for the drinking water source including conventional and unconventional groundwater augmentation techniques.

3. Providing technical design for low cost technology/system that would enable to provide water to all households.
4. Providing designs and Installation of WTPs, STPS and ETPs in GPs.
5. Providing design and Installation of Water Meters in GPs .
6. Providing design and Installation of Reverse Osmosis (RO) systems in GPs.
7. Installation and use of non-conventional energy source for water supply scheme.
8. Capacity Building/ technical skill imparting training related to water quality.

**B) Water Quality:-**

1. Establishment of Water Testing Laboratories in rural areas (Gram Panchayat level) .
2. Capacity Building/ technical skill imparting training related to water quality
3. Household treatment technology for safe drinking water (Chlorination & water purification) .
4. Research pilot project related to chemical contamination and health aspects .

C) **Sanitation:-**

1. Supply Chain Management-
   a. Development of Rural Sanitary Mart (RSM) on cooperative basis
   b. Ensuring availability of material for sanitation facilities through RSMs
2. Providing Design/Construction of user friendly, innovative, low cost, toilets suitable in rural areas for-
   a. Individual Household Toilets
   b. Providing Design/Construction of Child friendly School Toilet
   c. Providing Design/Construction of Child friendly Anganwadis Toilet.
   d. Community Toilets, Bio-Toilets, e-Toilets, Auto-Clean Toilets, etc.
   e. Integrated Women Sanitary Complexes.
3. Providing & installing Innovative and Cost effective Solid Waste Management infrastructure for GPs.
4. Providing & installing Innovative and Cost effective Liquid Waste Management infrastructure for GPs.
5. Projects for bio-waste management.
6. Menstrual Hygiene Management-
   a. Establishing production Units of Sanitary Napkin through SHGs in GPs.
   b. Providing a sanitation system for hygienic disposal of Sanitary Napkins in GPs, schools and Government establishments.
7. Capacity Building/technical skill imparting training related to Sanitation.
8. Construction of soak pit, leach pit, kitchen gardens and other newly developed technologies for eco-friendly domestic disposal.

**8. <u>Important parameters regarding CSR activities</u> :-**

a) No land or any other assets will be transferred to the company carrying out CSR activities.

b) Department would not be responsible for any kind of liabilities of the company undertakings activities.

c) As per the need, there shall be a Project Management Team which would provide project management support & monitor the Projects through effective use of I.T. based monitoring mechanism.

**9. <u>Snapshot of CSR guidelines:-</u>**

9.1 As per the guidelines on CSR, all profit making Central Public Sector Enterprises (CPSEs), including Maharatna CPSEs are required to select CSR activities and undertake them into a project mode. It is also required to allocate a budget mandatorily through a Board Resolution as per percentage of previous years net profit in the following manner. (Para 1.5.1 of Guidelines on Corporate Social Responsibility and Sustainability for Central Public Sector Enterprises, 1st April 2013):

9.2 The budgetary allocation is to be based on the profitability of the company and it is determined by the Profit After Tax (PAT) of the company in the previous year as per the following details:

| PAT of CPSE in the previous year | Range of Budgetary allocation for CSR activities (as % of PAT in previous year) |
|---|---|
| (i) Less than Rs. 100 crore | 3% - 5% |
| (ii) Rs. 100 crore to Rs. 500 crore | 2% - 3% |
| (iii) Rs. 500 crore and above | 1% - 2% |

9.3 Loss making CPSEs are not required to earmark specific funding for CSR activities.

This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201411171235121828A. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2014.11.20 16:38:38 +05'30'

**(Ajay Savarikar)**
Deputy Secretary, Government of Maharashtra

Copy forwarded to:

1. Principal Secretary to the Hon'ble Chief Minister of Maharashtra.
2. Private Secretary to the Hon'ble Minister Water Supply & Sanitation
3. Private Secretary to the Hon'ble State Minister Water Supply & Sanitation
4. Private Secretary to the Hon'ble Chief Secretary Government of Maharashtra
5. Principal Secretary, Water Supply & Sanitation Department, Mantralaya, Mumbai
6. Principal Secretary, Rural Development Department, Mantralaya, Mumbai
7. Principal Secretary, Public Health Department

8. Principal Secretary, School Education and Sports Department, Mantralaya, Mumbai
9. Principal Secretary, Women and Child Development Department, Mantralaya, Mumbai
10. Chairman, Maharashtra Industrial Development Corporation (MIDC)
11. Member Secretary, Maharashtra Jeevan Pradhikaran (MJP), Express Towers, Mumbai
12. Maharashtra Chamber of Commerce, Industry & Agriculture
13. Bombay Chamber of Commerce & Industry
14. Director, Groundwater Surveys & Development Agency (GSDA), Pune
15. Divisional Commissioners (All)
16. Deputy Secretaries (All), Water Supply & Sanitation Department
17. CEO - Zilla Parishad (All)
18. Project Manager, Jalswarajya - II, Reform Support & Project Management Unit (RSPMU)
19. Director, Water & Sanitation Support Organization (WSSO)
20. Deputy Commissioner (Development) (All)
21. Deputy Commissioner (Women and Child Development) (All)
22. Deputy Director, Groundwater Surveys & Development Agency (All)
23. Superintending Engineer – Bharat Nirman Cell, Maharashtra Jeevan Pradhikaran (MJP)
24. Executive Engineer, Rural Water Supply, Zilla Parishad (All)
25. Senior Geologist, Groundwater Surveys & Development Agency (All)
26. District Project Manager (DPM), Zilla Parishad (All)
27. Concern Members from Civil Society, NGOs and Educational Experts
28. All desks, Water Supply & Sanitation Department
29. Select File - CSR